नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
(कॉटन मार्केट जि.नागपूर)

महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन निर्णय क्र. गोदाबां-१०१३/२०७८/प्र.क्र.४८६/नापु-१६-ब
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २५ जुलै, २०१८

वाचा-

१) शासन निर्णय क्रमांक:- गोदाबां-१०१३/२०७८/प्र.क्र.४८६/नापु-१६-ब, दि.१६.०८.२०१७
२) अन्नधान्य वितरण अधिकारी ,नागपूर यांचे पत्र क्र.अविअ/गोदादु/कावि ,२०१८/३४-दि.२६.०४.२०१८

प्रस्तावना-

मा.उच्च न्यायालयात दाखल जनहित याचिका क्र.५१/२०१६ च्या अनुषंगाने नागपूर शहरातील कॉटन मार्केट येथील जुनी नादुरुस्त गोदामे पाडून त्याठिकाणी नवीन गोदाम बांधकाम करण्याचे आदेशित करण्यात आले होते. त्याअनुषंगाने कॉटन मार्केट जि.नागपूर येथील जुनी नादुरुस्त गोदामे पाडून त्याठिकाणी नवीन गोदाम बांधकामास दि.१६.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर यांनी दि.२६.०४.२०१८ रोजीच्या पत्रान्वये कॉटन मार्केट येथील गोदामास देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता ही सन २०१२-१३ च्या दरसूचीवर सन २०१७-१८ या वर्षी प्राप्त होणे, त्यामुळे प्रस्तावित अंदाजपत्रकामध्ये वाढ होणे, प्रस्तावित ४ गोदामे बांधकामाकरिता उपलब्ध जागा अपुरी असणे, प्रस्तावित अंदाजपत्रकामध्ये आवश्यक बाबीचा अंतर्भाव नसणे व GST ची तरतुद नसणे या कारणामुळे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या निधीमध्ये गोदामाचे बांधकाम होणार नसल्याने कॉटन मार्केट येथील गोदामास दि.१६.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येऊन त्याऐवजी प्रत्येकी १८०० मे.टन क्षमतेच्या दोन गोदामांसाठीच्या नव्याने सादर केलेल्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे. त्या अनुषंगाने कॉटन मार्केट येथील गोदामास दि.१६.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येऊन त्याठिकाणी प्रत्येकी १८०० मे.टन क्षमतेच्या दोन गोदाम बांधकामासाठीच्या अंदाजपत्रकास नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत हाती घेण्यात आलेल्या प्रकल्पांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

२. कॉटन मार्केट जि.नागपूर येथील गोदाम बांधकामास दि.१६.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे. तसेच कॉटन मार्केट

जि.नागपूर येथील जुनी नादुरुस्त गोदामे पाडून त्याठिकाणी नवीन गोदाम बांधकामांच्या नव्याने प्राप्त झालेल्या अंदाजपत्रकास व कामास पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर अंदाजपत्रक उप विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकामा उपविभाग क्र.३, नागपूर यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, नागपूर, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर तसेच उपभोक्ता विभागाच्या वतीने अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर यांनी साक्षांकित केले आहे.

II. सदरचे अंदाजपत्रक मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांनी तयार केलेल्या नकाशावर आधारित आहे.

III. सदर अंदाजपत्रक सन २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारित आहे.

IV. अंदाजपत्रकामध्ये इमारतीच्या बांधकामासह (१८४९.८२ चौ.मि.) विदयुतीकरण, पाणीपुरवठा व मलनि:स्सारण, संरक्षण भिंत, अंतर्गत रस्ते, स्टोर किपर कॉर्टर, रेन वाटर हार्वेस्टिंग, आग प्रतिबंधक व्यवस्था, इ.साठी तरतूद करण्यात आली आहे.

V. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

VI. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

VII. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

VIII. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

IX. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. **शासकीय गोदाम बांधकाम**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | प्रस्तावित गोदामाचे ठिकाण | गोदाम संख्या | प्रस्तावित एक गोदामाची क्षमता (मे.टन.) | प्रस्तावित गोदामांची एकूण क्षमता (मे.टन) | सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय यांच्याकडील छाननीअंती मान्य अंदाजित खर्च ( रू.) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | **नागपूर** | नागपूर | कॉटन मार्केट | २ | १८०० | ३६०० | ५,९६,६८,७६१ |
| **अक्षरी रुपये पाच कोटी शहान्नव लाख अडुसष्ट हजार सातशे एकसष्ट फक्त** | | | | | | | |

४. कॉटन मार्केट येथील जुनी जीर्ण गोदामे पाडून टाकण्यासाठी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ च्या भाग पहिला, उप विभाग १ अनुक्रमांक ९, नियम क्रमांक ११४ मधील अटींचे पालन करण्यात यावे.

५. वित्त विभागाच्या दि.१६ जानेवारी, १९८४ च्या शासन निर्णयानुसार शासनाच्या प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष नियंत्रणाखालील मालमत्तेचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविणे बंधनकारक असल्याने या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात येत असलेल्या कॉटन मार्केट जिल्हा नागपूर येथील शासकीय गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचा/गोदामातील साठयाच्या विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा.

६. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या नवीन शासकीय गोदाम बांधकामासाठी निधी प्राप्त झाल्यांनतर शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने सुरू करण्यात येऊन विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावीत.

७. सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी घ्यावी.

८. सदर गोदाम बांधकामावरील खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात व तदनंतर वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

९. उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष " ४४०८, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक यावरील भांडवली खर्च ०१/ अन्न १०१ प्रापण व पुरवठा , ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक १०१, ग्रामीण गोदाम कार्यक्रम, (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (मुफसल) (योजनेंतर्गत) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे " या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

१०. बांधकामासाठी विलंब अथवा इतर कारणाने वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर गोदामाचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. सदर गोदाम बांधकामाच्या कामांना आवश्यकतेनुसार निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

११. सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

१२. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यांनतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरिक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

१३. काम सुरू करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घेण्यात यावी.

१४. गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य गोदाम बांधकामाव्यतिरिक्त इतर सोयी सुविधांच्या समावेशाबाबत शासन स्तरावरुन दिलेल्या विविध सुचना विचारात घेवून जिल्हाधिकारी यांच्या स्तरावर खातरजमा करुन वजन काटे कार्यालये, प्रसाधन गृहे, इ. सोयींचा आवश्यकतेनुसार अंतर्भाव करावा.

१५. क्षेत्रीय स्तरावरुन प्राप्त अंदाजपत्रकाच्या छाननीअंती सार्वजनिक बांधकाम विभागाने Recapitulation Sheet मध्ये सुधारणा केल्या आहेत. सदर Recapitulation Sheet व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीसंबधी टिपणीच्या प्रती जिल्हाधिकारी व कार्यकारी अभियंता यांना निर्गमित करावयाच्या प्रतीसोबत जोडली आहे.

१६. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१, उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. सदर प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनौपचारीक संदर्भ क्रमांक-२२३५८३/ उस (इमा), दिनांक ०६.०३.२०१८ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीनुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२७१४४९५६३४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Deoman Baswant

Digitally signed by Sunil Deoman Baswant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P. Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8883fe608dc825b4f80204357f8a6fadfe8507e0636b91f3c5fefef9c43acfe1, cn=Sunil Deoman Baswant
Date: 2018.07.27 14:50:16 +05'30'

**( सु.दे.बसवंत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उप आयुक्त (पुरवठा) , नागपूर.
२. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग,मुंबई.
३. जिल्हाधिकारी, नागपूर.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बाधंकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग, नागपूर.
६. जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-४,अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय,मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय,मुंबई
१३. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर पुणे ४११००५
१४. निवड नस्ती/नापु-१६-ब.